**महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील २२१० जी ८६१ या लेखाशिर्षाखालील निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२२/प्र.क्र.१३३ /आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: १६ फेब्रुवारी, २०२३.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दि.२६ फेब्रुवारी, २०१९.
२) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्रमांक: राआहसो /लेखा /प्रअ /१०१४०/१२७७/२०२२ दिनांक १७.०८.२०२२
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.४८/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०९/०२/२०२३.

प्रस्तावना :-

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेचे आयुष्मान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी ८६१ (SCP) या लेखाशिर्षाखाली रु.१३०,९१,९५,००० इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर योजनेच्या लाभार्थ्यांसाठी माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या कालावधीतील विमा हप्ता विमा कंपनीस अदा करण्यासाठी रु. ३२,१३,३६,२५८/- (रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठठावन्न मात्र) व हमी तत्वावरील दाव्यांच्या प्रदानासाठी रू ५९,९८,१३०/-( रूपये एकोणसाठ लक्ष अठ्ठयाण्णव हजार एकशे तीस मात्र) असा एकून रूपये ३२,७३,३४,३८८ इतका निधी २२१० जी ८६१ (SCP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या कालावधीतील विमा हप्ता विमा कंपनीस अदा करण्यासाठी रु ३२,१३,३६,२५८/- (रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठठावन्न मात्र) व हमी तत्वावरील दाव्यांच्या प्रदानासाठी रू ५९,९८,१३०/-( रूपये एकोणसाठ लक्ष अठ्ठयाण्णव हजार एकशे तीस मात्र) असा एकून रू. ३२,७३,३४,३८८ इतका सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग

करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रकमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सासेसायटीच्या नावे काढण्यात यावा.

**मागणी क्र. एन-३**

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
७८९ - अनुसूचित जाती उप-योजना
(०१)-अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना
(०१)(०३)-महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (कार्यक्रम)
२२१० जी ८६१ (दत्तमत), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) शासनाने विहीत केलेल्या विमा दराने सदरचा निधी हा एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमाहप्त्यापोटी विमा कंपनीस व हमी तत्वावरील दाव्यांच्या प्रदानासाठी संबंधीत रूग्णालयास प्रदान करण्यात यावा.
२) सदरचा निधी विमा कंपनीस विमाहप्ता अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमून्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

३. सदर निधी राज्य आरोग्य हमी सोसायटी, महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना या खात्यामध्ये रु ३२,१३,३६,२५८/- (रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठठावन्न मात्र) व राज्य आरोग्य हमी सोसायटी कोविड-१९ या खात्यामध्ये रू ५९,९८,१३०/-( रूपये एकोणसाठ लक्ष अठ्ठयाण्णव हजार एकशे तीस मात्र) इतका निधी जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

५. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापुर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. शासनाच्या धोरणानूसार सदर प्रस्तावावरील निधी

राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यामध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४.४.२०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ. सं. क्र.३०/२०२३/व्यय-१४, दिनांक २०.०१.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०२१६११४८२५४४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2023.02.16 14:48:30 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३प्रती)
९. कक्ष अधिकारी (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती.